**महाराष्ट्रातील शौर्यपदक/सेवापदक धारकांना रोख रक्कम, जमीन अथवा जमिनीच्या बदल्यात रोख रक्कम देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांकःशौपपु-२०१०/५८१/प्र.क्र.२१३/२८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १६.१०.२०१०.

**<u>वाचा</u> :** १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांकःशौपपु-२०००/३०३/प्र.क्र.३१(२०००)/२८, दिनांक ०३.०७.२०००.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक शौपपु-२००१/२८९८/ प्र.क्र.-१६/२००२/२८, दिनांक १६.०८.२००२,
३) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६२११/सैकवि-१६/गौपु/४५५०, दिनांक ०६.०८.२०१०,
४) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६२११/सैकवि-१६/गौपु/४६९९, दिनांक १२.०८.२०१०,

**<u>शासन निर्णय</u> :-**

उपरोक्त संदर्भ अ.क्र.(१) व (२) येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली सैन्यातील १४ प्रकारच्या शौर्यपदक/सेवापदक धारकांना रोख रक्कम, जमीन अथवा जमिनीच्या बदल्यात रोख रक्कम देण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. त्यानुसार संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी संदर्भाधीन अ.क्र.(३) व (४) येथील पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावात अंतर्भूत सैन्यातील निरनिराळया मोहिमा/युध्दामध्ये तसेच मे १९९९ पासून उदभवलेल्या जम्मू-काश्मिर जवळील क्षेत्रातील लष्कराच्या "ऑपरेशन विजय" मोहिमेत व त्यानंतरच्या युध्दात शौर्यपदक/सेवापदक प्राप्त झालेल्या महाराष्ट्रातील अधिकारी/जवानांनां त्यांच्या नावासमोर खाली दर्शविल्याप्रमाणे रोख रक्कम, जमीन अथवा जमिनीच्या बदल्यात रोख रक्कम देण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ. क्र. | शौर्यपदक/सेवापदक धारकाचे नाव व पत्ता | शौर्यपदक/ सेवापदक | पदक प्राप्त झाल्याचा दिनांक | एकूण रोख रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | जेसी-४५९८०९,<br>नायब सुबेदार आबासाहेब जानोबा वाघमोडे,<br>मु.पो. ता.जत, जि.सांगली. | मंन्शन-ईन-डिस्पॅच्र | १५.०८.२००९ | १२,०००/- |
| २ | १५३२७ आर. एफ (एन)<br>एअर व्हाईस मार्शल अजित शंकरराव भोसले,<br>१७७, जनतारा, साळोखे नगर ,<br>कळ्र्बा रोड, कोल्हापूर. | अतिविशिष्ट सेवा पदक | २६.०१.२०१० | ३४,०००/- |
| | | | एकूण | ४६,०००/- |

२. या प्रयोजनार्थ होणारा रु.४६,०००/- (रुपये सेहचाळीस हजार फक्त) इतका खर्च मागणी क्र.ए-४, लेखाशीर्ष "२०७५-संकीर्ण सर्वसाधारण सेवा, ८००-इतर खर्च (००)(०५) शौर्यासाठी पारितोषिके (२०७५०११३) ०५-बक्षिसे" याखाली सन २०१०-२०११ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा. तसेच सदरचा खर्च हा मासिक निधी विवरणपत्रानुसार करण्याची दक्षता घेण्यात यावी.

२. याबाबत संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी संबधित पुरस्काराथ्र्यांना सदरहू रक्कम लाभाथ्र्यांची पात्रता काळजीपूर्वक तपासून विहीत मुदतीत देण्याच्या सूचना त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय अधिका-यांना द्याव्यात व तत्संबंधीचा अहवाल तात्काळ शासनास पाठवावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.शौपपु-२००० / ३०३ / प्र.क्र.३१ (२०००) / २८, दिनांक ०३.०७.२००० तसेच क्र.शौपपु- २००१/ २८९८ / प्र.क्र.१६ (२००२) / २८, दिनांक १६.०८.२००२ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www .maharashtra. gov. in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१०१०१६१९३९०८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

( अ. द. जोशी )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री (मासैक),यांचे स्वीय सहायक
मा.राज्यमंत्री (मासैक),यांचे स्वीय सहायक,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई, (शाखा -ड-५/ड-६) (२० प्रती),
महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई - ४०० ००५,
जिल्हाधिकारी, सागली/ कोंल्हापूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली / कोल्हापूर,
संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे - ४११००६, (५ प्रती)
जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, सांगली / कोल्हापूर,
सह संचालक, लेखा व कोषागार,संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन,मुंबई - ३२,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
वित्त विभाग (व्यय-४ ) ,
सामान्य प्रशासन विभाग (कार्या-२५)
निवड नस्ती (२ प्रती).